**कोव्हीड-१९ या आजारामुळे निधन पावलेल्या व्यक्तीच्या नजिकच्या नातेवाईकास सानुग्रह सहाय्य प्रदान करणेबाबत - मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक ०४.०२.२०२२ रोजी दिलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- सीएलएस-२०२१/प्र.क्र.२५४/म-३,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०९ फेब्रुवारी, २०२२

वाचा :-

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. न्यायिक-२०२१/प्र.क्र.४८८/आरोग्य-५, दि.१३ ऑक्टोबर, २०२१.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२१/प्र.क्र.२५४/म-३, दि.२६नोव्हेंबर, २०२१

३) शासन शुध्दीपत्रक , महसूल व वन विभाग, क्र.सीएलएस-२०२१/प्र.क्र.२५४/म-३, दि.८ डिसेंबर, २०२१.

**परिपत्रक** :-

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका (सिव्हील) क्र.५३९/२०२१ मधील संकीर्ण अर्ज क्र.१८०५/२०२१ मध्ये दि.४ ऑक्टोबर, २०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार, कोविड-१९ मुळे मृत्यु पावलेल्या व्यक्तींच्या जवळच्या नातेवाईकास रु.५००००/- इतके सानुग्रह सहाय्य देण्याबाबत वर नमूद दि.२६ नोव्हेंबर, २०२१ च्या शासन निर्णयान्वये सविस्तर आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. मा. सर्वोच्च न्यायालयाने दि.२९ नोव्हेंबर, २०२१ रोजी दिलेल्या आदेशानुसार याकरिता संगणकीय प्रणाली विकसित करण्यात आली असून दि.१ डिसेंबर, २०२१ पासून ऑनलाईन पध्दतीने अर्ज घेण्याची कार्यवाही सुरु करण्यात आली आहे. मा.सर्वोच्च न्यायालयाने या प्रकरणी दि.४ फेब्रुवारी, २०२२ रोजी दिलेल्या आदेशानुसार खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.:-

१) सर्व जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाने सानुग्रह सहाय्यासाठी प्राप्त होणारे ऑफलाईन अर्ज देखील गुणवत्तेनुसार विचारात घ्यावेत. या योजनेसाठी ऑफलाईन अर्ज प्राप्त झाला या कारणास्तव अर्ज नाकारण्यात येऊ नये. ऑफलाईन पध्दतीने प्राप्त झालेल्या व केवळ या कारणास्तव नाकारलेल्या अर्जाचा सात दिवसाच्या आत पुर्नविचार करावा आणि अशा मंजूर अर्जाची सानुग्रह सहाय्याची रक्कम अर्जदाराच्या बँक खात्यात प्रदान करण्यात यावी. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, १०१ अनुग्रह सहाय्य -(९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च - (९१)(०१) रोख भत्ता, मृत व्यक्तींच्या कुटुंबीयांना सहाय्य जखमींना मदत (अनिवार्य), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ ०१५५) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतुदीमधून भागविण्यात यावा.

२) सानुग्रह सहाय्यासाठी प्राप्त झालेल्या पात्र अर्जदारांना झाल्यास अर्ज केल्याच्या दिनांकापासून १० दिवसाच्या आत रक्कमेचे प्रदान करावे. तांत्रिक कारणास्तव अर्ज नाकारण्यात येऊ नयेत.

२. तसेच या योजनेशी अंमलबजावणीमध्ये येणाऱ्या अडचणी विचारात घेऊन खालील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.:-

१) या योजनेसाठी अपात्र असलेल्या अर्जदारांना अथवा कोविड-१९ मुळे मृत्यू पावलेल्या व्यक्तींच्या एकापेक्षा जास्त नातेवाईकास सानुग्रह सहाय्य मंजूर केल्याचे निदर्शनास आले असल्यास त्याची खात्री करुन व अर्जदारास त्याचे म्हणणे मांडण्याची संधी देऊन अशा अपात्र अर्जदारांकडून सानुग्रह सहाय्याची रक्कम जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाने वसूल करावी. ही रक्कम वसूल केल्यानंतर खालील बँक खात्यात जमा करण्यात यावी.

| बँकेचे नाव | शाखा | खातेदाराचे नाव | खाते क्र. | IFSC Code |
|---|---|---|---|---|
| कोटक महिंद्रा | खेतान भवन, १९८, जमशेदजी टाटा रोड, मुंबई - ४००० २० | सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग | 9545462854 | KKBK0000647 |

२) गाऱ्हाणे निवारण समितीच्या सदस्य सचिवांनी त्यांच्याकडे प्राप्त झालेल्या सर्व अपीलांची तातडीने सुनावणी आयोजित करावी. अर्जदारास स्वत: उपस्थित राहणे शक्य नसल्यास त्यांनी प्राधिकृत केलेल्या प्रतिनिधीमार्फत त्यांचे म्हणणे ऐकून घेण्यात यावे. सर्व अपीलांच्या सुनावणीसाठी किमान ३ संधी देण्यात याव्यात. त्यानंतरही अपीलकर्ता स्वत: अथवा त्याचा प्रतिनिधी सुनावणीसाठी हजर न राहिल्यास आणि अथवा त्याने त्याच्या अपीलाबाबत कोणतीही कागदपत्रे उपलब्ध करुन दिली नसल्यास गाऱ्हाणे निवारण समितीस एकतर्फी निर्णय घेता येईल.

तांत्रिक कारणास्तव काही जिल्ह्यांच्या/ महानगरपालिकेच्या गाऱ्हाणे निवारण समितीच्या कार्यकक्षेत असलेले काही अपील अन्य गाऱ्हाणे निवारण समितीकडे प्राप्त झाले आहेत. असे अपील केवळ कार्यकक्षेत नसल्याच्या कारणास्तव नाकारण्यात येऊ नयेत. संबंधित अपीलाची सुनावणी आयोजित करण्यात यावी आणि त्यांच्या अपीलावर गुणवत्तेनुसार निर्णय घ्यावा.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०२०९१८००३३२११९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2022.02.10 12:06:21 +05'30'

**( संजय औ. धारूरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व जिल्हाधिकारी,
२. आयुक्त, सर्व महानगरपालिका,

३. सर्व जिल्हा शल्य चिकीत्सक,
४. सर्व महानगरपालिकेचे वैद्यकीय अधिकारी

**प्रत-**

१) अपर मुख्य सचिव (सार्वजनिक आरोग्य विभाग),जी.टी.हॉस्पीटल, मुंबई,
२) सर्व विभागीय आयुक्त,
३) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई
४) सर्व प्रशासनिक विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवड नस्ती (कार्यासन/ म-३).